**सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी समग्र शिक्षा अभियान (प्राथमिक, माध्यमिक व शिक्षक शिक्षण) कार्यक्रमासाठी निधी (अनुसूचित जाती उपयोजना हिस्सा) वितरीत करणेबाबत. (केंद्र व राज्य हिस्सा)**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः समग्र-२०२३/प्र.क्र.०१ (भाग-३)/एस.डी-१**
मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १५ फेब्रुवारी, २०२३

**वाचा :-**

१) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक पीआरई-२०००/(२७४०)/प्राशि-१, दि.१८/०१/२००२
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थस-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४/०४/२०२२
३) केंद्र शासन, शिक्षण मंत्रालय, शालेय शिक्षण व साक्षरता विभाग, नवी दिल्ली आदेश क्रमांक : ७-२/२०२२-IS-१२/ IS.१ (SC), दि.१३/१२/२०२२ ची पाच पत्रे.
४) राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदे यांचे पत्र क्र.मप्राशिप/लेखा-२/Ist Inst/Ele,Sec,TE/Rec,NonRec/(SAP,GEN,SC,ST)/निधीमागणी /२२-२३/३७८१ दिनांक ३०/१२/२०२२
५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक बीजीटी-२०२२/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प (विघयो) दिनांक ८/२/२०२३

**प्रस्तावना:-**

समग्र शिक्षा अभियान (प्राथमिक, माध्यमिक व शिक्षक शिक्षण) योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र : राज्य) ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने दिनांक १३/१२/२०२२ रोजीच्या आदेशान्वये अनुसूचित जाती उपयोजना (SCP) निधी रु.५३,५२,०५,०००/- (रु.त्रेपन्न कोटी बावन्न लाख पाच हजार फक्त) इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने दिनांक ३०/१२/२०२२ च्या विवरण पत्रान्वये अभिप्राय दिले आहेत. केंद्र शासनाच्या निधीशी समरुप राज्य हिस्सा रु.३५,६८,०३,३३३/- (रु.पस्तीस कोटी अडुसष्ठ लाख तीन हजार तीनशे तेहतीस) इतका येतो.

उपरोक्त प्रमाणे केंद्र शासनाने वितरीत केलेला निधी व समरुप राज्य हिस्सा निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांना निधी वितरीत करण्याबाबत उपरोक्त संदर्भीय ५ येथील सामाजिक न्याय व विशेष सहाय्यक विभागाच्या शासन निर्णय दिनांक ८/२/२०२३ नूसार मंजुरी देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय:-**

समग्र शिक्षा योजनेसाठी (प्राथमिक, माध्यमिक व शिक्षक शिक्षण) रु.८९,२०,०८,३३३/- (रु.एकोणनव्वद कोटी विस लाख आठ हजार तीनशे तेहतीस फक्त) इतका निधी राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे खालीलप्रमाणे वितरीत करण्यास या आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय तरतूद | वितरीत तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | "मागणी क्र.एन-३, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, ७८९, अनुसूचित जाती उप योजना, (०१) अनुसूचित जाती उप योजनांतर्गत योजना, (०१) (०३) समग्र शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा ६० टक्के), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०२ आय ७४६) | रु.१९४.०३९९ कोटी | रु.५३,५२,०५,०००/- (रु.त्रेपन्न कोटी बावन्न लाख पाच हजार फक्त) |
| २ | "मागणी क्र.एन-३, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, ७८९, अनुसूचित जाती उप योजना, (०१) अनुसूचित जाती उप योजनांतर्गत योजना, (०१) (०४) समग्र शिक्षा अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०२ आय ७५५) | रु.१२०.०८ कोटी | रु.३५,६८,०३,३३३/- (रु.पस्तीस कोटी अडुसष्ठ लाख तीन हजार तीनशे तेहतीस) |
| | **एकूण** | | **रु.८९,२०,०८,३३३/- (रु.एकोणनव्वद कोटी विस लाख आठ हजार तीनशे तेहतीस फक्त)** |

३. उपरोक्त प्रमाणे वितरित करण्यात आलेल्या रकाना क्र. ४ येथील निधीचा खर्च रकाना क्र.२ मध्ये नमुद केलेल्या लेखाशिर्षातून सन २०२२-२३ या वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. वित्त विभागाच्या दि.०४/०४/२०२२ रोजीच्या परिपत्रकात नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरित केलेला निधी उपरोक्त संदर्भाधीन केंद्र शासनाचे दिनांक १३/१२/२०२२ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार खर्च करावा. तसेच अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावा.

६. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०४/०४/२०२२ च्या शासन परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह सचिव

(प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरचे अनुदान सशर्त अनुदान असून अटी व शर्ती सदर शासन निर्णयामध्ये नमुद केल्याप्रमाणे आहेत. यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.०४/०४/२०२२ च्या शासन परिपत्रकान्वये, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४३/२०२३/व्यय-१४ दिनांक २७/१/२०२३ व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा शासन निर्णय दिनांक ८/२/२०२३ च्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२१५१८२१४७३३२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH UMESHRAO GAIKWAD

Digitally signed by SANTOSH UMESHRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BC8833F9E213A7E4DFB9D2B071C9202EA52A04054E53B0C1BBF9E50C90A2CF5C, cn=SANTOSH UMESHRAO GAIKWAD
Date: 2023.02.15 18:24:57 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
६) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
७) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
९) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
१०) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
११) वित्त विभाग, (व्यय-५ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१२) अवर सचिव / कक्ष अधिकारी, रोख शाखा/ अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती (एस.डी.१)